कार्यक्रम अंदाजपत्रके २०१७-१८ तयार करणे व मुद्रण करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः काअंप-२०१७/प्र.क्र. १०५ /अर्थ-१.**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
तारीख: १४ मार्च, २०१७

वाचा: - १) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक: काअंप-१००३/प्र.क्र.३९/अर्थ-१, दि. २३ सप्टेंबर, २००३
२) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक: काअंप-२०१५/प्र.क्र.७४/अर्थ-१, दि. १३ ऑक्टोंबर, २०१५
३) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक: अंदाज-२०१६/प्र.क्र.८५/अर्थ-१, दि. २९ सप्टेंबर, २०१६
४) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक: अंदाज-२०१६/प्र.क्र.१०५/अर्थ-१, दि. २६ ऑक्टोंबर, २०१६
५) शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक:संकीर्ण-२०१६/प्र.क्र.८८/अर्थ-१, दि. २७ जानेवारी,२०१७
६) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक: काअंप-२०१७/प्र.क्र.१०५/अर्थ-१, दि. ६ मार्च, २०१७.

## परिपत्रक

विधानमंडळाच्या मार्च २०१७ मध्ये होणाऱ्या अर्थसंकल्पीय अधिवेशनात सन २०१७-२०१८ ची कार्यक्रम अंदाजपत्रके अर्थसंकल्प विधानमंडळास सादर झाल्यानंतर त्याच दिवशी अथवा दुसऱ्या दिवशी विधानमंडळास सादर करण्याच्या सूचना परिपत्रक क्र. अंदाज-२०१६/प्र.क्र.१०५/अर्थसंकल्प-१, दि. २६ ऑक्टोंबर, २०१६ च्या परिपत्रकान्वये देण्यात आल्या आहेत.

२. सन २०१७-१८ या आर्थिक वर्षापासून सर्व विभागांच्या अर्थसंकल्पीय अंदाज (White Book) या प्रकाशनामध्ये योजनांतर्गत व योजनेतर असे वर्गीकरण न दर्शविता ते एकत्रित रित्या दर्शविले जाणार आहे. याप्रमाणेच कार्यक्रम अंदाजपत्रकातही बदल करणे आवश्यक असल्याने त्यानुसार योग्य ते बदल करण्यात यावेत.

३. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१७०३१४१७४६५७२९०५ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vasant K. Patil

Digitally signed by Vasant K. Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=FINANCE DEPT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=16a60323ef3beff915e7cf13b9836a7df2ad6df610965aab153a71bdb81c36c1, cn=Vasant K. Patil
Date: 2017.03.14 17:48:24 +05'30'

(व. कृ. पाटील)
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. सर्व मंत्रालयीन विभाग (संसदीय कार्य विभाग व विधानमंडळ सचिवालय सोडून) मंत्रालय, मुंबई.
२. कक्ष अधिकारी, सर्व अर्थसंकल्पीय कार्यासने, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. संचालक, शासकीय मुद्रण व लेखनसामग्री, मुंबई (२० प्रतीसह), त्यांना विनंती करण्यात येते की, त्यांनी सर्व शासकीय मुद्रणालयांना योग्य त्या सूचना द्याव्यात व त्याची प्रत सहसचिव, वित्त विभाग यांना माहितीसाठी पाठवावी.
४. वित्त विभाग, कार्यासन प्रशासन-४ (१० प्रती), मंत्रालय, मुंबई.
५. निवड नस्ती, अर्थसंकल्प-१.